**<u>आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२४-२५ मध्ये लघु पाटबंधारे योजना पेंढरी, ता. मुरबाड, जि. ठाणे या प्रकल्पाच्या जमीन खरेदी तसेच अन्य कामांकरिता निधी वितरण लेखाशिर्ष ४७०२ ७७२१</u>**

**महाराष्ट्र शासन**
**मृद व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: आवियो-२०२४/प्र.क्र. ३४६/जल-४**
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक: १६ जुलै,२०२४.

**<u>वाचा:</u>** १) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. संकिर्ण-०३/२०१५/प्र.क्र. ३४/अ-२, दिनांक १२ मे, २०१५ व ३० सप्टेंबर, २०१५.
२) शासन परिपत्रक महसूल व वन विभाग, क्र. एलक्यूएन-०१/ २०१७/ प्र.क्र. १२ / अ-२, दिनांक २५ जानेवारी, २०१७.
३) मृद व जलसंधारण विभाग,शासन निर्णय क्र.भूसंपा-२०१७/प्र.क्र.२३३(भा-२)/ जल-४, दिनांक ०८/०२/२०१९.
४) प्रादेशिक जलंसधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, ठाणे यांचे पत्र क्र. प्राजअ./ मृवजवि/ लेशा-२ / ७२७ /२०२४ , दिनांक २६/०४/२०२४.
५) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. बीयुडी-२०२३/ प्र. क्र. ११ / कार्यासन-६, दिनांक १२ जुलै, २०२४.
६) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि. ०१/०४/२०२४.

<u>प्रस्तावना:</u>

१०१ ते २५० हेसिंक्ष असलेल्या लघुपाटबंधारे योजना पेंढरी ता. मुरबाड जि. ठाणे या आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गतच्या प्रकल्पासाठी आदिवासी विभागाने संदर्भीय क्र. ५ येथील शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन दिलेल्या निधीचे वितरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**<u>शासन निर्णय</u>** :

**लघु पाटबंधारे योजना पेंढरी ता. मुरबाड जि. ठाणे या प्रकल्पाच्या जमीन खरेदी, मोजणी शुल्क, Tail Channel Design By COAP आणि अन्य कामांची देयके अदा करण्यासाठी एकूण रुपये ३२८.१० लक्ष (रुपये तीन कोटी अठ्ठावीस लक्ष दहा हजार फक्त ) निधी खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून वितरित करण्यात येत आहे.**

**अ)** वरील प्रकल्पाच्या भुसंपादन तसेच कामांचे देयकाकरिता अन्य स्त्रोतांकडून निधी उपलब्ध झाला असल्यास याद्वारे वितरित करण्यात येत असलेल्या रक्कमांचे आहरण अथवा वितरण करण्यात येवू नये,

**ब)** तसेच उपरोक्त प्रयोजनार्थ उपलब्ध करुन देण्यात येत असलेल्या वरील निधीची गरज नसल्यास, सदर निधी कोणत्याही परिस्थितीत परस्पर अन्य प्रयोजनार्थ वितरित करण्यात येवू नये,

**क)** कोणत्याही कारणे निधी अखर्चित राहिल्यास, सदर रक्कम तातडीने शासनाकडे प्रत्यार्पीत करावी,

**ड)** निधी वितरणासंबंधीच्या वित्त विभागाच्या संदर्भीय दिनांक ०१/०४/२०२४ च्या परिपत्रकामधील मार्गदर्शक सुचनांचे व आदिवासी विकास विभागाच्या संदर्भिय आदेशामधील निदेशांचे काटेकोर अनुपालन करण्यात यावे.

**इ)** कामाच्या गुणवत्तेची खात्री करुन व केलेल्या कामाच्या देयकाआधारे निधीचे वितरण करावे व त्याबाबतचा अनुपालन अहवाल आदिवासी विकास विभागास व प्रस्तुत विभागास सादर करावा.

३. याद्वारे वितरित करण्यात आलेली रक्कम प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, ठाणे यांनी आहरित करुन, त्यांचे अधिनस्त संबंधित जिल्हा जलसंधारण अधिकाऱ्यांकडे त्वरेने वितरित करावी.

४. यावर होणारा खर्च पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक टी-६,
४७०२- लहान पाटबंधा-यांवरील भांडवली खर्च,
७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना,
(०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना
(०२) (१८) राज्य एकत्रित निधी अंतर्गत लहान पाटबंधारे योजना
(राज्यस्तर योजना) (४७०२ ७७२१)
५३, मोठी बांधकामे

५. वरील खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे महालेखाकार कार्यालयास सादर करुन त्याच्या प्रतिस्वाक्षरित प्रती तसेच प्रक्ल्प पुर्ण झाल्यावर प्रकल्प पुर्णत्वाचे प्रमाणपत्र आदिवासी विकास विभाग व प्रस्तुत विभागास उपलब्ध करुन द्यावे.

६. याद्वारे वितरित निधीचा ताळमेळ ठेवण्याची जबाबदारी संबंधित प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग यांची राहील व अप्पर आयुक्त तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण प्रादेक्षिक क्षेत्र, पुणे हे सदर बाबींचे समन्वयक प्राधिकारी राहतील.

७. प्रस्तुत आदेश, आदिवासी विकास विभागाच्या संदर्भीय आदेशामधील मान्यतेनुसार व वित्त विभागाच्या संदर्भीय परिपत्रकान्वये प्रशासकिय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तींनुसार निर्गमित करण्यात येत असून महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२४०७१६१७२९२६२६२६ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

YOGESH SHIVAJI THAKRE

Digitally signed by YOGESH SHIVAJI THAKRE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT, 2.5.4.20=12b49c34288b66cadf05f508044fb7990386a7a80b591f01ea5c5637b8e9531f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8B737CC2C4B5965A0F6266A94D548836ABFD8BD70D096E1702CD9556363A062D, cn=YOGESH SHIVAJI THAKRE
Date: 2024.07.16 17:40:56 +05'30'

**( यो. शि. ठाकरे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
२) अपर आयुक्त तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण प्रादेक्षिक क्षेत्र, पुणे.
३) प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, ठाणे.
४) उपविभागीय अधिकारी, कल्याण उपविभाग, कल्याण.
५) जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, कळवा-ठाणे.
६) महालेखापाल (लेख व अनुज्ञेयता) / (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपुर
७) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे.
८) कक्ष अधिकारी (जल- ११), मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
९) कक्ष अधिकारी, कार्यासन -०६, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) निवड नस्ती, कार्यासन (जल-४)

**प्रत अग्रेषित,**

१) मा. विरोधी पक्ष नेता (विधान परिषद) विधानमंडळ, मुंबई यांचे कार्यालय.
२) मा. विरोधी पक्ष नेता (विधान सभा) विधानमंडळ, मुंबई यांचे कार्यालय.
३) स्थानिक लोकप्रतिनिधी (मार्फ़त संबधित मृद व जलसंधारण उपविभागिय अभियंता).
४) मा. मंत्री (मृद व जलसंधारण) यांचे खाजगी सचिव.
५) मा. मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव.
६) सचिव, आदिवासी विकास विभाग, यांचे स्वीय सहाय्यक.
७) सचिव, मृद व जलसंधारण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक.
८) आयुक्त, मृद व जलसंधारण विभाग, महाराष्ट्र राज्य, छत्रपती संभाजी नगर.